घरबांधणी अग्रिम मंजूर करताना घराच्या
किंमतीवरील कमाल मर्यादा सुधारणेबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग.
परिपत्रक क्रमांक: घबांअ-१०९४/प्र.क्र. ८९/९४/विनियम.
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २७ एप्रिल १९९४.

वाचावे:- १] शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.घबांअ-१०९०/[१८]/विनियम, दिनांक ११ जुलै १९९० [परिच्छेद २ व ३ ]
२] शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:घबांअ-१०९२/प्र.क्र .७६/९२/विनियम, दिनांक ३ ऑक्टोबर १९९२ . [परिच्छेद-२].

## परिपत्रक

उपरोक्त शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:घबांअ-१०९०/[१८]/विनियम, दिनांक ११ जुलै, १९९० च्या परिच्छेद-२ प्रमाणे कर्मचाऱ्याला त्याच्या मूळ मासिक वेतनाच्या ५० पट/ २५ पट घर बांधणी अग्रिम मंजूर करण्याची तरतूद आहे. तसेच ह्या शासन निर्णयाच्या परिच्छेद-३ प्रमाणे नवीन बांधावयाच्या किंवा विकत घ्यावयाच्या तयार घराची किंमत [जमिनीची किंमत वगळून] मर्यादा विहित केली आहे. हीच किंमत मर्यादा उपरोक्त शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक:घबांअ-१०९२/प्र.क्र.७६/९२/विनियम, दिनांक ३ ऑक्टोबर, १९९२ च्या परिच्छेद-२ नुसार सुधारित करण्यात आली आहे. तथापि, कांही प्राधिकाऱ्यांनी अशी धारणा केली आहे की, उपरोक्त सुधारणेमुळे शासकीय कर्मचाऱ्याला त्याच्या मूळ मासिक वेतनाच्या ५० पट/२५ पट ऐवजी १५० पट घरबांधणी अग्रिम अनुज्ञेय ठरते. याबाबत खालीलप्रमाणे अधिक स्पष्टीकरण करण्यात येत आहे:-

स्पष्टीकरण :- उपरोक्त शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:घबांअ-१०९०/[१८]/विनियम, दिनांक ११ जुलै, १९९० च्या परिच्छेद-२ मध्ये शासकीय कर्मचाऱ्याला त्याच्या मूळ वेतनाच्या आधारे मंजूर करण्यात येणाऱ्या मर्यादेत कोणताही बदल करण्यात आलेला नाही. मात्र ह्या शासन निर्णयाच्या परिच्छेद-३ मध्ये नवीन बांधावयाच्या किंवा विकत घ्यावयाच्या तयार घराची किंमत [जमिनीची किंमत वगळून] जी मर्यादा निर्धारित केली होती, ती मर्यादा शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक: घबांअ-१०९२/प्र.क्र.७६/९२/विनियम, दिनांक ३ ऑक्टोबर, १९९२ च्या परिच्छेद-२ नुसार सुधारित करण्यात आली आहे. त्यामुळे शासकीय कर्मचाऱ्याला

ह्या आदेशांच्या आधारे त्यांच्या मूळ मासिक वेतनाच्या १५० पट घरबांधणी अग्रिम अनुज्ञेय ठरतो, ही धारणा बरोबर नाही. तरी ज्या सक्षम प्राधिका-यांनी शासकीय कर्मचा-यांना त्यांच्या मूळ मासिक वेतनाच्या १५० पट घर बांधणी अग्रिम मंजूर केला असेल, त्यांनी सदर प्रकरणे तात्काळ वित्त विभागाच्या निदर्शनास आणावीत. तसेच अशा कर्मचा-यांची देयके मंजूर करणा-या संबंधित लेखा अधिका-यांनीसुध्दा त्यांच्या कार्यालयीन कागदपत्रांची पडताळणी करुन अशी प्रकरणे वित्त विभागाच्या निदर्शनास आणावीत.

२. तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: घबांअ-१०९२/प्र.क्र.७६/९२/विनियम, दिनांक ३ ऑक्टोबर, १९९२ च्या परिच्छेद-२ मध्ये "नवीन बांधावयाच्या किंवा विकत घ्यावयाच्या तयार घराची किंमत [जमिनीच किंमत वगळून] शासकीय कर्मचा-याच्या मूळ मासिक वेतनाच्या १५० पट परंतु किमान रुपये २.५० लाख असावी" असे नमूद केले असले तरी घर बांधणी अग्रिम मंजूरीसाठी सक्षम प्राधिकारी ही किमान मर्यादा प्रकरणपरत्वे गुणवत्तेच्या आधारे शिथील करु शकतील. म्हणजेच शासकीय कर्मचारी रु.२.५० लाखापेक्षा कमी किंमतीचे घर घेण्यास पात्र ठरविता येईल. मात्र सदर परिच्छेदातील कमाल रुपये ६.०० लाख ही विहित कमाल मर्यादा शिथील करण्याचे अधिकार सक्षम अधिका-यांना नाहीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ ना. हे. सोनारे ]
कार्यासन अधिकारी,
वित्त विभाग.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभागांचे सचिव,
उप सचिव, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,

मंत्रालयाच्या विविध प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.

सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी/सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी/सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व उप कोषागार अधिकारी,
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता]-१, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता]-२, महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल [लेखापरीक्षा]-१, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल [लेखापरीक्षा]-२, महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

-------